**सैनिक सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेच्या प्रवेश परीक्षेकरिता परीक्षार्थी मुलांकडून घेण्यात येणाऱ्या परीक्षा शुल्कातून होणा-या खर्चाबाबत एकत्रित आदेश निर्गमित करण्याबाबत. (स्वीय प्रंपजी लेख्यातून)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन पूरकपत्र क्रमांकः एसपीआय-२०१७/ प्र. क्र. ३४५/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २३/०२/२०२२.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्र. एसपीआय- २००२/९१०/प्र.क्र.८४/२००२)/२८, दिनांक ३१/०८/२००२
२) शासन निर्णय क्र. एसपीआय- २०१५/(प्र.क्र. ०४/१५)/२८, दिनांक २५/०३/२०१५
३) शासन पूरकपत्र क्रमांकः एसपीआय-२०१७/ प्र. क्र. ३४५ /२८, दि. ०६/०१/२०१८
४) संचालक,सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद यांचे पत्र क्र. ३११५/लेखा/एसपीआय-३/२२४, दि. २९ नोव्हेंबर, २०२१

**शासन पुरकपत्र:-**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेच्या प्रवेश परीक्षेकरिता छात्रांकडून घेण्यात येणाऱ्या परीक्षा शुल्कात वाढ करण्याबाबत संदर्भाधिन शासन निर्णय क्रमांक २ हा वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केला आहे. छात्रांकडून घेण्यात येणा-या परिक्षा शुल्कातून परीक्षेकरिता करावयाच्या खर्चाच्या बाबी अंतर्भूत असलेले परिशिष्ट "अ" या शासन निर्णयात उक्त संदर्भ क्र. ३ अन्वये समाविष्ट करण्यात आले होते. आता सदर संदर्भ क्र. ३ येथील शासन पुरकपत्र अधिक्रमित करण्यात येत आहे आणि त्याऐवजी सुधारित परिशिष्ट "अ" समाविष्ट करण्यास या पूरकपत्राद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०२२३१७१३०३९००७ असा आहे. हे पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.02.24 16:39:36 +05'30'

**(शिवाजी गोरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. मंत्री( मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,
४) मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक ,
५) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

७) महालेखापाल (लेखा व आुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई - ४०० ०३२,

९) कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,

१०) सर्व विभागीय आयुक्त,

११) सर्व जिल्हाधिकारी,

१२) कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

१३) संचालक, संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको, एन-१२, सेक्टर, औरंगाबाद-४३१ ००३,

१४) संचालक, सैनिक कल्याण विभाग, "रायगड"राष्ट्रीय युध्दस्मारका समो, घोरपडी, पुणे-४११ ००१,

१५) सर्व कोषागार अधिकारी,

१६) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,

१८) सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासान भवन, मुंबई ४०० ०३२,

१९) महासंचालक, माहिती व जानसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

२०) वित्त विभाग (व्यय ४), अर्थ-१४ मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

२१) शालेय शिक्षण विभाग (माध्यमिक शिक्षण-५), मंत्रालय, मुंबई-३२.

२२) सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

२३) निवड नस्ती (२ प्रती).

शासन पूरक पत्र सामान्य प्रशासन विभाग क्रमांक २०१७/ प्र.क्र.३४५/२८, दिनांक २३/०२/२०२२ चे सहपत्र.

**जोडपत्र : परिशिष्ट “ अ”**

| अक्र. | परीक्षार्थी मुलांकडून घेण्यात येणाऱ्या परीक्षा शुल्कातून परीक्षेकरीता खालीलप्रमाणे खर्च करण्यात येतो. |
|---|---|
| १ | अर्जाच्या संख्येनुसार प्रश्नपत्रिका व उत्तरपत्रिका केंद्रनिहाय मुद्रीत करणे. |
| २ | लेखी परीक्षेकरिता व तोंडी मुलाखती करिता लागणारे स्टेशनरी साहित्य यावरील खर्च भागविणे. |
| ३ | प्रवेश परीक्षेचे पेपर केंद्रनिहाय मुद्रित करणे व सुमारे पाच हजार (५०००) परीक्षार्थीकरीता उत्तर पत्रिका उपलब्ध करणे. |
| ४ | परीक्षा केंद्रांचे बाजार भावाप्रमाणे संपूर्ण दिवसाचे भाडे प्रदान करणे |
| ५ | परीक्षा केंद्रांवरील पर्यवेक्षक, समावेक्षक, सुरक्षा रक्षक, शिपाई यांना स्थानिक दरानुसार मानधाची रक्कम प्रदान करणे |
| ६ | प्रवेश परीक्षांचे पेपर काढण्यासाठी संबंधित प्राध्यापकांना मानधन देणे. |
| ७ | दरवर्षी एसपीआयच्या प्रवेश प्रक्रियेची जाहिरात विविध वृत्तपत्रांत द्यावी लागते सदर खर्च कार्यालयीन खर्च अथवा जाहिरात व प्रसिध्दी उपशिर्षातून भागविणे शक्य नाही या करीता खर्च करणे |
| ८ | संस्थेच्या माहिती पुस्तिकेचे प्रिटिंग करणे |
| ९ | ऑनलाईन पद्धतीने मुलाखती निर्धोकपणे आयोजित करण्यासाठी साहित्य खरेदी करणे/सेवा प्राप्त करणे व वीजपुरवठा खंडीत झाल्यास व्यत्यय येऊ नये म्हणून इनव्हर्टर बॅटरी सहित खरेदी करणे. |
| १० | प्रत्यक्ष मुलाखती करिता लागणा-या कक्षाचे तसेच हॉलचे भाडे प्रदान करणे |
| ११ | उन्हाळयाचे दिवस असल्याने,परीक्षा केंद्रांवर छात्रांचे पालक दुरवरुन परीक्षेकरीता मुलांसोबत येत असल्याने, त्यांच्या करिता पुरेशी सावली रहावी या करीता खुला मंडप टाकणे, पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करणे इत्यादी बाबीं करीता रक्कम खर्च करणे |
| १२ | मोठयाप्रमाणात पालक व परिक्षार्थी मुले/मुली परीक्षाकेंद्रावर येत असल्याने त्यांना वेळो वेळी विविध सुचना देण्यासाठी ध्वनी क्षेपक यंत्र ( पी. ए. सिस्टम) ची आवश्कता असते त्याचे भाडे प्रदान करणे |
| १३ | ऑनलाईन फॉर्म सबमीशन , वेबसाईट रखरखाव , परीक्षेचा निकाल कळविणे करीता पोस्टेज स्टॅम्प इत्यादीवर खर्च करणे. परीक्षार्थींच्या बाबत विदा (Data) सुरक्षिततेसाठी आणि छाननीसाठी तज्ञ लोकांची सेवाप्राप्त करणे. काळानुसार व परिस्थितीनुसार काही बदल करणे आवश्यक आहे. |
| १४ | परीक्षा केंद्रांवरील पर्यवेक्षक, कर्मचारी वर्ग यांच्याकरिता अल्पोपहार , पीण्याच्या पाण्याची व्यवस्था करणे. |
| १५ | अर्ज केलेल्या सर्व उमेदवारांचे डोझीयर तयार करणे व त्याकरिता लागणऱ्या स्टेशनरी साहित्याची तरतूद करणे |
| १६ | जाहिरात परिणामकारक होण्यासाठी शहरात वेगवेगळया ठिकाणी होर्डीग्ज लावणे, सेमिनार आयोजित करणे,सेमीनारचा संपूर्ण खर्च जसे हॉलचे भाडे, सेमीनारच्या ठिकाणी जाण्यायेण्यासाठी लागणारा खर्च,तसेच या अनुषंगाने होणारा सर्व खर्च भागविणे |
| १७ | परीक्षा केंद्राच्या चारही शहरात बस स्टँण्ड व रेल्वे स्थानका पासून परीक्षाकेंद्रा पर्यंत रुट चार्ट चे फलक लावणे याबाबत येणारा खर्च भागविणे |
| १८ | एकाच दिवशी लेखी परीक्षा आयोजित होत असल्याने महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांना शासनाच्या ध्येयधोरणानुसार मानधन प्रदान करणे. |

| | |
|---|---|
| १९ | एकाच दिवशी लेखी परीक्षा आयोजित होत असल्याने वेगवेगळ्या केंद्रावर संस्थेचे अधिकारी व कर्मचारी यांना उपस्थित राहण्याकरिता स्वत:चे वाहन किंवा भाड्याचे वाहन वापरण्यास परवानगी तसेच भत्ता प्रदान करणे |
| २० | संस्थेत पुरेसे मनुष्यबळ नसल्यामुळे संस्थेचे अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्या जबाबदारी व्यतिरिक्त प्रवेश परीक्षा संबंधीची अतिरिक्त कामे करावी लागत असल्यामुळे त्यांना अतिकालिक भत्ते प्रदान करणे. |
| २१ | सामान्य प्रशासन विभाग शा. निर्णय क्र. सैकवि-२०१६/प्र.क्र.३२/का-२८, दि. २९ ऑक्टोबर २०२१ अन्वये सुधारित आकृतीबंधानुसार संस्थेत पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध नसल्याने कंत्राटी पद्धतीवर प्रवेश परीक्षेच्या कामासाठी कर्मचा-यांची नेमणुक करणे व त्यांचे मानधन प्रदान करणे. |
| २२ | एसपीआयची प्रवेश प्रक्रिया ही महाराष्ट्रातील वेगवेगळ्या केंद्रांवर होत असल्याने, तेथे जाण्या-येण्यासाठी शासकीय वाहनांचा वापर केला जातो त्याकरीता लागणारे इंधन,रखरखाव ( Maintenance Repair) व इतर किरकोळ साहित्य यांचा खर्च भागविणे |
| २३ | एसपीआयची प्रवेश प्रक्रिया राबविण्यासाठी सर्वच केंद्रावर संस्थेचे नियामक मंडळ ( ज्यात सैन्या दलातील निवृत्त वरिष्ठ अधिकाऱ्याचा समावेश आहे) यांच्या करीता वेळोवेळी अल्पोपहार, भोजन व निवास याकरिता खर्च करणे. काळानुसार व परिस्थितीनुसार काही बदल करणे आवश्यक. |
| २४ | एसपीआयचे अधिकारी, कर्मचारी परीक्षेसाठी ज्यांना जबाबदारी दिली जाईल त्यांना कार्यालयामार्फत निर्गमित झालेल्या कार्यालयीन आदेशानुसार रक्कम अदा करणे(उदा. लोकसभा, विधानसभा,स्थानिक संस्थांच्या निवडणूकांमध्ये अधिकारी, कर्मचारी यांना जे भत्ते/मानधन देण्यात येते त्याप्रमाणे रक्कम अदा करणे ) |
| २५ | एसपीआय प्रवेश परीक्षा ज्या ठिकाणी घेण्यात येते तेथे जाण्या-येण्यासाठी व स्थानिक कामासाठी , शासकीय वाहन उपलब्ध न झाल्यास भाडयाने वाहन घेणे व प्रति कि.मी. प्रमाणे स्थानिक दरानुसार त्याचे रक्कम प्रदान करणे. काळानुरूप बदल करण्यासाठी अनुक्रमांक ३ अर उल्लेख केला आहे. |
| २६ | नियामक मंडळाचा परीक्षा केंद्रावर येण्या-जाण्यासाठी वाहतूक खर्च,संस्थेच्या प्रवेश परीक्षेसाठी व मुलाखतीसाठी एसपीआयच्या नियामक मंडळ सदस्यांचा प्रवास खर्च व दैनंदिन भत्ता हा प्रवास खर्च या उपशिर्षातून प्रतिपूर्ती न झाल्यास प्रवास खर्चाचे शासन निर्णयानुसार प्रवास खर्चाच्या रक्कमेचे प्रदान करणे तसेच परीक्षेसाठी आवश्यक असणाऱ्या कोणत्याही प्रकारच्या कामाची रक्कम प्रदान करणे. |